**<u>बीड, लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील टंचाईग्रस्त भागात जनावरांच्या छावण्या उघडण्याबाबत.</u>**

**<u>महाराष्ट्र शासन</u>**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.एससीवाय-२०१५/प्र.क्र.२४८ /म-७**
**मंत्रालय, मुंबई.**
**दिनांक:- २० ऑगस्ट, २०१५**

**वाचा:** १) शा.नि., म.व व.विभाग, क्र.एससीवाय-०४/२०१०/प्र.क्र.४३/म-११, दि.१९.०४.२०१०
२) शा.नि., म.व व.विभाग, क्र.एससीवाय-२०११/प्र.क्र.२१९/म-७, दि.०३.०१.२०१२

**प्रस्तावना :-**

राज्यातील विविध भागात अल्प पाऊस तसेच पावसामध्ये मोठा खंड पडल्यामुळे टंचाईसदृश्य परिस्थिती निदर्शनास आली आहे. यासंदर्भात विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी त्यांच्या दिनांक ३१.७.२०१५ च्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार लातूर, बीड आणि उस्मानाबाद येथे सरासरी पर्जन्यमानापेक्षा कमी पाऊस झाल्यामुळे व या जिल्ह्यातील पशुधनाची संख्या जास्त असल्याने सदर भागात चारा टंचाई जास्त झाल्याने चारा टंचाई निवारणार्थ तातडीने उपाययोजना करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :-

टंचाईग्रस्त भागातील जनावरांच्या चा-याच्या प्रश्नावर मात करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनासंदर्भात दि.११.०८.२०१५ रोजी संपन्न झालेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत राज्यातील बीड, लातूर व उस्मानाबाद जिल्ह्यातील टंचाईग्रस्त भागात आवश्यकतेनुसार जनावरांना सवलतीच्या दराने चारा उपलब्ध करुन देण्यासाठी जनावरांच्या छावण्या उघडण्याचा निर्णय घेण्यात आला. तद्नुषंगाने टंचाईग्रस्त भागात आवश्यक तेथे चारा उपलब्ध होईपर्यंत वा पावसाचे प्रमाण समाधानकारक होईपर्यंत जनावरांच्या छावण्या उघडण्यास खालील अटींच्या अधिन राहून परवानगी देण्यात येत आहे.

**अ) <u>अटी</u>** :-

१) जिल्हाधिकारी बीड, लातूर व उस्मानाबाद यांनी आवश्यकतेनुसार जनावरांच्या छावण्या उघडाव्यात. जनावरांच्या छावण्या फक्त बीड, लातूर व उस्मानाबाद याच जिल्ह्यांसाठी असून या जिल्ह्यापैकी ज्या तालुक्यात चारा टंचाई तीव्र आहे अशा तालुक्यात अंतीम पर्याय म्हणून चारा छावण्या तातडीने सुरु कराव्यात.

२) जनावरांच्या छावणीत किमान ५०० व कमाल ३००० हजार जनावरे ठेवण्यात यावीत. त्यानंतर वेळोवेळी परिस्थितीचे आकलन करुन व आढावा घेऊन अधिक छावण्या उघडण्याबाबत

जिल्हाधिका-यांनी निर्णय घ्यावा. तथापि, प्रकरणपरत्वे आवश्यकता असल्यास छावणीतील जनावरांची किमान संख्या २५० पर्यंत शिथिल करण्याचे अधिकार जिल्हाधिका-यांना असतील.

३) या सवलती प्रत्येक जनावराच्या मालकांना त्यांच्याकडे असल्यापैकी जास्तीत जास्त ०५ जनावरापर्यंत (लहान व मोठे) मर्यादित असेल.

४) चारा टंचाई निर्माण झाल्यामुळे जेथे शेतक-यांना व गुरे असणा-या अन्य व्यक्तींना गुरे सांभाळणे अशक्य होते, तेथे जिल्हाधिका-यांच्या मंजुरीने सहकारी साखर कारखाने व इतर कारखाने, सहकारी खरेदी-विक्री संघ, कृषि उत्पन्न बाजार समित्या, दूध खरेदी विक्री संघ यासारख्या संस्थांमार्फत गुरांच्या छावण्या उघडण्यात याव्यात. तसेच ग्राम पंचायती, विविध कार्यकारी विकास सोसायट्या, स्वयंस्वेवी/सेवाभावी संस्था यांनी पुढाकार घेतल्यास अशा संस्थांना जिल्हाधिका-यांनी परवानगी द्यावी.

५) जिल्हाधिकारी गुरांच्या छावण्या उघडण्याकरिता संबंधित संस्थाना किती गुरांसाठी छावण्या उघडणे आवश्यक आहे, याचा ढोबळमानाने अंदाज घेतील. शासनाची अशी अपेक्षा आहे की, सर्व सहकारी साखर कारखान्यांनी कमीत कमी आपापल्या संस्थेच्या सभासदांच्या जनावरांची सोय गुरांच्या छावणीत करावी.

६) स्थानिक जनावरांची गरज भागून चारा उपलब्ध आहे, अशा ठिकाणी शक्यतो गुरांच्या छावण्या उभाराव्यात. गुरांच्या छावण्यांच्या ठिकाणी मुबलक पाणी, चारा व जनावरांसाठी सावली उपलब्ध असणे वा तशी सोय करुन घेणे आवश्यक राहील.

७) छावणीचे स्थान हे शक्यतो बाजाराच्या ठिकाणाजवळ असावे.

८) छावणीत घ्यावयाची गुरे त्यांच्या मालकांच्या संमतीने व महसूल अधिका-यांचा दाखला प्राप्त झाल्यावर घेण्यात यावीत व ती त्यांच्या इच्छेनुसार छावणीत ठेवण्यात यावीत.

९) सहकारी साखर कारखान्यांनी गुरांचा चारा म्हणुन उसाचे वाढे वापरावेत. तसेच बगास, युरिया व मळी यांचे मिश्रण करुन पशुखाद्य तयार करावे.

१०) छावणीतील जनावरांच्या शेणाची विल्हेवाट लावण्याचे स्वातंत्र्य तसेच जबाबदारी छावणीचालक संस्थेची/ छावणी चालविणा-या व्यक्तींची राहील.

११) छावणीतील जनावरांच्या खाद्यात पेंड आठवड्यातुन किमान ०३ दिवस (एक दिवसा आड) आयुक्त, पशुसंवर्धन,पुणे यांनी निश्चित केलेल्या प्रमाणात देण्यात यावी.

१२) केंद्र शासनाच्या नैसर्गिक आपत्ती निकषानुसार छावणीतील मोठ्या गुरांना प्रतिदिन रु.७०/- व लहान गुरांना प्रतिदिन रु.३५/-या दराने छावणी चालविणा-या संस्थेस अनुज्ञेय राहील.

१३) शासन निर्णय क्र.एससीवाय-१४/२०१०/प्र.क्र.४३/म-११, दि.१९.०४.२०१० सोबतच्या सहपत्र "फ" नुसार लाभार्थ्यांचे कार्ड, सहपत्र "ग" नुसार छावणी चालक/संस्था यांना दिलेल्या

रकमेची माहिती व सहपत्र "ह" नुसार छावणी जनावरांना प्रवेश देताना करावयाची टप्पानिहाय कार्यवाही याबाबतच्या सूचनांची योग्य ती अंमलबजावणी करण्यात यावी.

१४) जनावरांच्या छावण्या उघडण्याबाबत जिल्हाधिकारी यांनी समन्वय साधून तातडीने कार्यवाही करुन याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

१५) जनावरांच्या छावण्या उघडण्यात आलेल्या जिल्हयातील जिल्हाधिकाऱ्यांना छावण्यांची तपासणी व तद्नुषंगीक बाबीसाठी छावणी खर्चाच्या ०.२५ टक्के रक्कम प्रशासकिय खर्च म्हणून अनुज्ञेय राहील.

**ब) <u>छावणीतील गुरांच्या देखभालीबाबत.</u>**

१) छावणीमध्ये दाखल करण्यात आलेल्या जनावरांना द्यावयाच्या ओल्या व सुक्या चाऱ्याचे परिमाण पशु वैद्यकीय अधिकारी/पशुधन विकास अधिकारी यांच्याकडून निश्चित केल्याचे प्रमाणपत्र घेण्यात यावे.

२) छावणीत दाखल केलेल्या जनावरांच्या नोंदी विहित नमुन्याच्या नोंदवहीत घेण्यात याव्यात.

३) छावणीतील जनावरांना आवश्यक ती औषधे देणे व लसीकरण गरजेचे आहे, पशु वैद्यकीय अधिकारी यांनी याबाबतच्या नोंदी छावण्यांना दिलेल्या भेटीच्या वेळी घेणे आवश्यक आहे. सदर नोंदवह्या अद्यावत ठेवाव्यात.

४) तालुका/ जिल्हा पशुसंवर्धन अधिका-यांनी गुरांच्या छावण्यास वेळोवेळी भेटी द्याव्यात आणि गुरांची वैद्यकीय तपासणी करावी. यासंदर्भात पशुसंवर्धन विभागाच्या व संबंधित जिल्हा परिषदेच्या प्रचलित योजनेनुसार अनुज्ञेय असलेली औषधे आवश्यकतेनुसार (सदरहू जनावरांच्या औषधोपचारासाठी) संबंधित पशुसंवर्धन यंत्रणेमार्फत उपलब्ध करुन दिली जावीत.

५) शेतीच्या कामासाठी शेतक-यांनी बैलांना ८-१० दिवस घरी नेण्याची परवानगी मागितल्यास ती देण्यात यावी. जेवढे बैल बाहेर नेले असतील तेवढेच बैल काम झाल्यानंतर छावणीत दाखल करुन घेण्यात यावेत.

**क) <u>छावण्यांची तपासणी</u>**

१) विभागात उघडण्यात आलेल्या छावण्यांची तपासणी करण्यासाठी संपर्क अधिकारी म्हणुन उप आयुक्त दर्जाचा अधिकारी, जिल्ह्यात उप जिल्हाधिकारी दर्जाचा अधिकारी व तालुक्यात नायब तहसिलदार दर्जाचा अधिका-याची नेमणुक करण्यात यावी.

२) उपरोक्त अधिका-यांनी त्यांच्या अखत्यारित येणा-या छावणीस खालीलप्रमाणे भेटी द्याव्यात.

अ) तहसिलदार /नायब तहसिलदार - आठवड्यातुन ०२ वेळा

ब) उप जिल्हाधिकारी - १५ दिवसातुन ०१ वेळा

उप आयुक्त दर्जाच्या अधिकाऱ्याने संपर्क अधिकारी या नात्याने उपरोक्त अधिकाऱ्यांकडून जिल्हाधिकाऱ्यांना त्यांच्या भेटीचे अहवाल प्राप्त होतात किंवा नाही याकडे लक्ष द्यावे.

**ड) छावण्यांची देयके पारित करण्याबाबत.**

१) छावणी प्रमुख/ महसूल अधिकारी यांनी प्रमाणीत केलेली जनावरांची संख्याच ग्राह्य धरण्यात यावी.

२) अधिका-यांनी छावण्यांना दिलेल्या भेटीच्या वेळी काढलेले निष्कर्ष विचारात घ्यावेत.

३) खर्चाची मागणी मान्य करताना शेण विक्रीपोटी छावणीचालकांना मिळालेल्या उत्पन्नाची रक्कम विचारात घेऊन तेवढ्या रकमेची मागणी कमी करावी.

४) सदर शासन निर्णयातील सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. यावरील खर्चाची देयके संबंधितांनी जिल्हाधिकाऱ्यांनी सादर करावी. जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे प्राप्त झालेल्या देयकांची पडताळणी करावी. यासाठी येणारा खर्च "२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१-अवर्षण-१०१ (००)(०७) वैरणीचा पुरवठा (२२४५००७५) (योजनत्तर)" तसेच गुरांच्या छावण्यांबाबत पशुवैद्यकीय निगा यासाठी येणारा खर्च "२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१-अवर्षण-१०१(००) (०८) इतर बाबी (२२४५००८४)(योजनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालण्यात यावा. सदरहू खर्च २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा.

२. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३३५/२०१५/व्यय-९,दि.१३.८.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०८२११३५९३८८२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Rajaram Jagtap

Digitally signed by Ashok Rajaram Jagtap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Rajaram Jagtap
Date: 2015.08.21 14:05:45 +05'30'

**(अ.रा.जगताप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद
२) जिल्हाधिकारी, बीड/लातूर/उस्मानाबाद.
३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**प्रत माहितीस्तव,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई.
२) मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
४) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.